किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेअंतर्गत खरीप पणन हंगाम २०२१-२२ व रब्बी पणन हंगाम २०२२-२३ मधील धान/ भरडधान्य खरेदीकरीता नवीन बारदाना व जूना बारदाना खरेदीसाठी राज्यस्तरीय प्रशासकिय विभाग खरेदी समिती स्थापन करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग
शासन निर्णय क्र.वि.स.उ.स./न.बा.नि./४६२१/हं.२१-२२ व २२-२३/प्र.क्र.४०/का.२
८ वा मजला, गो.ते.रुग्णालय संकुल इमारत,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४००००१
दि.०८.०९.२०२१

वाचा : १. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दि.०१.१२.२०१६
२. केंद्रशासनाचे पत्र क्र.१५-१४/२०१/-Py.III, दि.१३.१२.२०१८
३. केंद्रशासनाचे पत्र क्र.१५-८/२०२१/-Py.III-Pt(१) (E३७६०९४), दि.०६.०७.२०२१. व दि. ३१/०८/२०२१ चे पत्र.

प्रस्तावना:-

केंद्र पुरस्कृत किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेअंतर्गत हंगाम २०१६-१७ पासून राज्यात विकेंद्रित खरेदी योजना (DCP) राबविण्यात येत आहे.

केंद्रशासनाच्या संदर्भांकित क्र.२ च्या पत्रान्वये निर्देर्शित केलेनुसार बारदाना वापर करणे आवश्यक आहे. सदर मार्गदर्शक सुचनांनुसार १ क्विं सीएमआर साठी लागणारे १.४९ क्विं धान ३७.५० किलोग्रॅम च्या मर्यादित भरल्यास २ नवीन व २ एकदा वापरलेला बारदाना आवश्यक आहे. केंद्रशासनाच्या https://dfpd.gov.in या वेब पोर्टलवर उपलब्ध असलेले बारदाना खरेदी बाबतचे धोरण निश्चित करण्यात आले आहे. त्यानुसार खरीप पणन हंगाम २०२०-२१ करिता नविन बारदाना खरेदी करण्याकरिता ज्युट कमिशनर, कोलकता यांच्याकडे आगाऊ रक्कम जमा करुन बारदाना खरेदी करण्यात आला परंतु त्यांचेमार्फत बारदाना विहीत वेळेत उपल्स्ब्ध होऊ शकला नाही. त्यामुळे राष्ट्रीय स्तरावरील निविदेमार्फत पुरवठादार निश्चित करुन काही प्रमाणात नविन बारदाना उपलब्ध करुन घेण्यात आला. खरीप पणन हंगाम २०२१-२२ करिता केंद्र शासनाने पाठविलेल्या संदर्भाकीत पत्र ३ नुसार ज्युट कमिशनर, कोलकता मार्फत पुरवठा होणारा बारदाना मागणी नुसार उपलब्ध होऊ शकणार नसल्याचे निदर्शनास आणुन दिले आहे. त्यामुळे धान व सीएमआर खरेदी करिता विहीत वेळेत बारदाना उपलब्ध होणेसाठी जाहिर निविदेद्वारे बारदाना उपलब्ध करुन घेणे ही बाब शासनाच्या विचाराधीन होती.

संदर्भीय क्र.१ अन्वये शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्य पद्धतीची सुधारीत नियमावली नियम क्र.२.९.२ अन्वये बारदाना खरेदी करीता राज्यस्तरीय प्रशासकिय विभाग खरेदी समिती गठित करणे व नवीन व जूना बारदाना खरेदीकरीता प्रशासकीय मंजूरी देणेची बाब शासनाच्या विचारधीन होती.

शासन निर्णय :-

केंद्र पुरस्कृत किमान आधारभूत योजने अंतर्गत धान व भरडधान्य खरेदी करिता केंद्र शासनाने २०२१-२२ खरीप व रब्बी पणन हंगामाकरिता दिलेले धान व भरडधान्य खरेदीचे उद्दीष्ट लक्षात घेता याकरिता लागणा-या नवीन व जुन्या ज्युट बॅग्स उपलब्ध करण्याकरिता राज्यस्तरीय प्रशासकीय खरेदी समिती खालीलप्रमाणे गठीत करण्यात येत आहे.

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | अध्यक्ष | - | प्रशासकीय विभाग प्रमुख | - | मा.सचिव, अ.ना.पु. व ग्रा.सं. विभाग |
| २. | सदस्य सचिव | - | सहसचिव/उपसचिव | - | अ.ना.पु. व ग्रा.सं. विभाग |
| ३. | सदस्य | - | वित्तीय सल्लागार व उपसचिव | - | अ.ना.पु. व ग्रा.सं. विभाग |
| ४. | सदस्य | - | निमंत्रीत | - | उद्योग सहसंचालक (भा.ख.)/उद्योग संचालनालयाचा प्रतिनिधी |
| ५. | निमंत्रीत | - | व्यवस्थापकीय संचालक | - | मार्केटिंग फेडरेशन, मुंबई |
| ६. | निमंत्रीत | - | व्यवस्थापकीय संचालक | - | आदिवासी विकास महामंडळ, नाशिक |
| ७. | निमंत्रीत | - | सहसचिव/उपसचिव | - | वित्त विभाग |

२. सदर समितीची कार्यकक्षा पुढील प्रमाणे राहील.

अ. बारदानासाठी निविदा अटी व शर्ती ठरविणे.

ब. निविदा प्रक्रिया राबविणे.

क. निविदेतील प्राप्त निविदाकारांच्या निविदांची तपासणी करणे.

ङ वित्तीय न्युनतम दर धारकाची  निविदा अंतीम करणे.

इ. निविदाकारांसोबत करार करणे.

३. समितीच्या बैठका आवश्यकतेनुसार घेण्यात येतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२१०९०९१५१२२७३२०६ असा आहे.  हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन निर्गिमित करण्यात येत आहे.

महाराष्टाचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Abhay Dongar Dhande

Digitally signed by Abhay Dongar Dhande
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Food Civil Supply Consumer Protection Department, postalCode=4000001, st=Maharashtra, 2.5.4.20=da21a70357404b356571c7082a767be6020327a0e32cf1d6b6fc6accdf98c18d, serialNumber=8cca0ae308227887c4504b21e5b7e00473de5551baf05a30ca1faf3de13e964a, cn=Abhay Dongar Dhande
Date: 2021.09.09 15:13:34 +05'30'

**( श्री. अभय धांडे )**
**वित्तीय सलागार व उपसचिव**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव
३. मा. मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे खाजगी सचिव
४. मा. मंत्री, वित्त, यांचे खाजगी सचिव
५. मा. मंत्री, पणन, यांचे खजगी सचिव
६. मा. मंत्री, आदिवासी विकास, यांचे खाजगी सचिव
७. मा. विरोधीपक्ष नेते (विधानसभा, विधान परिषद)
८. मा. राज्यमंत्री,  अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे खाजगी सचिव
९. मा. सर्वमंत्री/राज्यमंत्री, यांचे खजगी सचिव

१०. मुख्य सचिव, महाराष्ट शासन, मंत्रालय, मुंबई.
११. अप्पर मुख्य सचिव (वित्त), महाराष्ट शासन, मंत्रालय, मुंबई.
१२. सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग
१३. अप्पर मुख्य सचिव, कृषी व प. दु. म. विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. अप्पर मुख्य सचिव (पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. अप्पर मुख्य सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, कन्मुर हाऊस, मुंबई-४०००० ९.
१८. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या., आदिवासी विकास भवन, जुना आग्रा रोड, नाशिक-४२२००१.
१९. सर्व विभगीय आयुक्त.
२०. नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई.
२१. सर्व जिल्हाधिकारी
२२. सर्व उपायुक्त (पुरवठा).
२३. सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी.
२४. अन्नधान्य वितरण अधिकारी.
२५. उपसंचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई.
२६. सहसचिव/सर्व उपसचिव/सर्व अवर सचिव/सर्व अधिकारी, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय विस्तार मुंबई.
२७. सर व्यवस्थापक, (महा.) भारतीय अन्न महामंडळ, ५ वा मजला, राजेंद्र नगर, दत्तपाडा रोड, बोरिवली, पूर्व, मुंबई-४०० ०६६.
२८. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई, (५ प्रती).
२९. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय, ६ वा मजला, विधानभवन, मुंबई, (१० प्रती).
३०. मान्यताप्राप्त राजकीय पक्षांची कार्यालये, (प्रत्येकी ५ प्रती).
३१. सर्व विधान परिषद सदस्य व विधानसथा सदस्य.
३२. निवड नस्ती (का.२)